इत्यर्थ
वर्ष पहिले अंक दहावा
एप्रिल २०१३

संपादक:
सृजा (औरंगाबाद)



संपर्क: ई-साहित्य प्रतिष्ठान
जी-११०२, अकरावा मजला,
ईटर्निटी, तीन हात नाका,
इस्टर्न एक्स्प्रेस हायवे,
ठाणे पश्चिम. ४००६०४.
मो. ९८६९६७४८२०

वेबसाईट : www. esahity. com, etyarth. blogspot. in

ईमेल: esahity@gmail. com, etyarth. esahity@gmail. com.

# संपादकीय

संपादक म्हणून आज साऱ्याच वाचकांशी एक हृद्य संवाद करू इच्छित आहे. साधारण एक वर्षापूर्वी एप्रिल महिन्यातच इत्यर्थच्या संकल्पनेचा उदय झाला होता. ई-साहित्य प्रकाशन तोवर साधारणतः जास्त करून कवितांचीच नियतकालिकं आणि छोटेखानी काव्यसंग्रह इत्यादी प्रकाशित करत असे. पण एका सर्वसामान्य वाचकासाठी गद्यसाहित्यही मनाच्या जवळ जाणारं असतं असं मला सतत वाटत होतं. मी ई-साहित्य परिवाराशी संपादक म्हणून जोडले गेले आणि एक जादूई पोतं उघडल्यासारखं झालं. या माध्यमाच्या खऱ्या सशक्ततेचा अंदाज मला आला.

जसं जसं इत्यर्थचा एक एक अंक बनत गेला तसे तसे अजून अजून वाचक माझ्याशी जोडले गेले. अनेक अनेक लोकांना मी माहीत झाले आणि प्रत्येक अंकानंतर अत्यंत भरभरून प्रतिक्रिया आल्या. अगदी भरून पावल्यासारखं झालं.

इत्यर्थच्या संकल्पनेचा वाढदिवस मी आज साजरा करते आहे. आणि त्यासोबत माझ्या सगळ्या वाचकांनाही सामिल करून घेऊ इच्छिते आहे. येत्या महिन्यापासून अर्थात मे पासून आपण इत्यर्थमध्ये काही बदल करण्याच्या विचारात आहोत. आपल्याला आपलं इत्यर्थ कसं पहायला आवडेल काय बदल चांगले वाटतील हे आम्हाला कळवा. आपण लेखक असाल किंवा कधी वहीच्या, डायरिच्या मागच्या पानावर काही कधी लिहिलेलं असेल तर तेही पाठवा. आपल्यातले काही चित्रकार असतील तर चित्रं पाठवा. कुणी ई-पुस्तकं बनवण्याच्या प्रक्रियेत भाग घेण्यास उत्सुक असेल तर त्यांनीही या.

इत्यर्थ आपलं मासिक आहे. त्यामुळे आपल्याला जे वाटतं ते बिनधास्त लिहा आणि आम्हाला कळवा.

ईमेल करा etyarth. esahity@gmail. com वर. आपल्या प्रतिक्रियांची वाट पहात आहोत.

-सृजा
संपादक-इत्यर्थ.
टीम ई-साहित्य प्रतिष्ठान.

www.esahity.com



# अनुक्रम

| मोरपंख | श्रीधर पाठक |
|---|---|
| गहिऱ्या वेदनेचा नाथ | किरण भावसार |
| भुर्र | अनघा हुन्नुरकर |
| किरवंत | अरुण लेले |
| निर्माण | अमृता ढगे, मयुर सरोदे |

# मोरपंख

“अरे श्रीधर, आज संध्याकाळी तू काय करतोयस? जरा येऊन जा ना घरी. खूप दिवसात भेट नाही झाली यार”
असा एक फोन सकाळी सकाळी मला येतो. पलीकडचा आवाज मखमली असतो. त्यात एक सुरेख लगाव असतो. कमालीचं प्रेम असतं. विलक्षण जिव्हाळा असतो. "मी येऊ शकत नाही"किंवा"जमणार नाही"असं (बाणेदार पुणेरी) उत्तर मी देऊच शकणार नाही इतकी आस त्या स्वरात असते!

माझ्या अंगावरून एक मोरपीस अलगद फिरलेलं असतं. त्याचा मुलायम स्पर्श. नजर ठरणार नाही इतकं त्या मोरपिसाचे सौंदर्य. निळ्या, हिरव्या, किरमिजी रंगांची उधळण. कधीही कमी न होणारी तकाकी. मोरपिसाची ही सारी वैशिष्ट्ये असणारी व्यक्ती फोनवर असते. मी संध्याकाळी भारल्यासारखा त्यांच्याकडे जातो. पंढरीला जाणाऱ्या एखाद्या भक्ताच्या ओढीने!

“यावे”- अशा आश्वासक सुरांनी स्वागत होतं. मी गेल्या गेल्या त्यांचे पायच धरतो. ६ फुट उंची आणि गोरापान वर्ण. राजबिंडा शब्द अगदीच सामान्य वाटावा असं व्यक्तिमत्व. या सगळयाच्या पुढे जाऊन अपार मायेने भरलेले अथांग निळे डोळे. त्या निळाईत पुढचे किती तास मी हरवून जातो त्याचं मला भानच उरत नाही!"रंगांचा उघडूनिया पंखा, सांज कुणी ही केली"अशी अवस्था होते.

ते असतात"सर्वश्री अरुण दाते”,"मराठी संगीतातला शुक्रतारा”,"अरु-भैया”, अरविंद दाते, ए. आर. दाते आणि काय काय! पण माझ्यासाठी माझे दुसरे वडील – माझे पूर्व संचित – माझे दाते साहेब!

शशी एरंडे या माझ्या जिवलग मित्रामुळे माझी दाते साहेबांशी ओळख झाली. २००४ ला मी जेव्हा अमेरिकेला गेलो होतो तेव्हा त्याने मला साहेबांकरता स्प्लेंडा (sugar equal) आणायला सांगितली. दाते साहेबांकरता काही तरी अमेरिकेतून आणायचं ही कल्पनाच मला इतकी सुखावून गेली की मी हरखूनच गेलो. अनेक दुकानं पालथी घालून ती मी घेऊन आलो. तेव्हा ती इथे मिळत नसे. त्याचं अप्रूप साहेबांना किती होतं ते नंतर त्यांची ओळख झाल्यावरच मला कळलं.

२००६ ला साहेब आमच्या सोसायटीत राहायला आले. आम्ही त्यांचं गाणं आमच्या गणेश उत्सवात ठरवलं. तेव्हा त्यांना प्रथम जवळून बघण्याचा आणि भेटण्याचा योग आला. तेव्हा मला काय ठाऊक की माझ्या पुढे काय"वाढून"ठेवलं आहे ते? दचकू नका. "वाढून ठेवणे"हा शब्दप्रयोग मी नेहमीच्या अर्थाने वापरला नाही. खऱ्या अर्थाने माझ्या पुढे पंच-पक्वानांनी भरलेलं ताट वाढलं होतं. असं ताट की ज्यात कितीही जेवलं तरी पदार्थही संपत नाहीत आणि माझं पोटही भरत नाही. साहेब त्या दिवशी अफाट गायले. गाण्याचा समारोप करताना त्यांनी एक उर्दू गझलही म्हटली. ती गाण्याआधी आम्हाला तिचा अर्थ समजावून सांगितला. नाही तर आम्ही मराठी मंडळी गझल ऐकणार म्हणजे आनंदच! शेजारी बसलेला"वाह वाह"म्हटला की आपण लगेच"क्या बात है"म्हणणार.

त्यानंतर आम्ही साहेबांना २६ जानेवारी च्या कार्यक्रमाला आमच्या सोसायटीत प्रमुख पाहुणे म्हणून बोलावलं. कार्यक्रम संपल्यावर"अरे तुम्ही सगळे जेवायलाच या ना घरी एकदा"असं अगदी मनापासून आमंत्रण आलं. पुण्यात कुणी असं म्हटलं की डोळ्यात पाणी, घशात आवंढा असं काय काय येतं! एवढ्या मोठ्या माणसाच्या घरी आपण जेवायला जायचं म्हणजे थोडी उत्सुकता आणि नाही म्हटलं तरी मनात थोडी भीती होतीच. जेवायला गेलो आणि भीती तर कुठल्या कुठे पळालीच पण त्या दिवशी आमचे सूर जुळले ते कायमचेच. त्या दिवशी माझ्या आयुष्यातलं एक नवीन पर्व सुरु झालं – असं पर्व की ज्याने मला आणि अनुला (माझी better half!) अपार आनंद दिला. अपार समाधान दिलं. असे कित्येक रसिक असतील, त्यांचे कित्येक मित्र असतील की ज्यांना हा परीसस्पर्श झाला – त्या मांदियाळीत मीही सामील झालो. धन्य झालो

नंतर एकमेकांकडे येणंजाणं सुरु झालं. ओळखी झाल्या. अतुल आणि संगीत या त्यांच्या दोन्ही मुलांशी ओळख झाली. "मैत्र"जुळायला सुरुवात झाली. या आनंद्यात्रेतला आणखी एक प्रवासी – मुकुंद दीक्षित. माझा जिवलग मित्र. शशी, मुकुंद, साहेब आणि मी यांची एक चौकडीच आहे. दाते साहेब आमची ओळख चक्क"हे माझे मित्र आहेत"अशीच करून देतात. काय कमाल आहे बघा – हृदयनाथ मंगेशकर आणि कुमार गंधर्व यांच्यासारखे मित्र असणारा माणूस आम्हाला मित्र म्हणतो. दाते साहेब तुमच्या या निर्मळ स्वभावाला सलाम!

मीना दाते (उर्फ वहिनी) हे एक स्वतंत्र प्रकरण होतं. "मीना"हे नाव त्यांच्या आई वडिलांनी विशेष विचार करून ठेवलं असावं. त्यात"मीन"(मासा) आहे. माहेरचं आडनाव राजे! चाणाक्ष वाचकांनी ओळखलं असेलच. करेक्ट! सीकेपी. त्यामुळे सामिष खाणे आणि खिलवणे यात उस्ताद. दाते साहेबांकडच्या आमच्या गप्पांच्या मैफिलीतला भैरवीचा मान वहिनींचा असायचा. काय तो जेवणाचा थाट वर्णू महाराजा! लाजबाब! हा शब्द खास साहेबांचा. त्यांच्यासारखाच. कितीही लोकांना केव्हाही (मनापासून) घरी जेवायला बोलावणाऱ्या दाते साहेबांच्या आयुष्यात हा"मत्स्यावतार"आला म्हणून ठीक नाहीतर काही धडगत नव्हती. जेवताना एखादा पदार्थ आवडला कीसाहेब हमखास म्हणणार"वा रे भारत देश!"ते मुंबईत रहात असताना त्यांच्या बिल्डिंग मध्ये बासू भट्टाचार्य राहायचे. वहिनींनी केलेल्या डिशेश खाल्या कीबासूदांचा हा पेट डायलॉग. ते बासुदा आणि त्यांचा तो डायलॉग याची आठवण साहेब अजूनही जागवतात. जेवल्यावर"अन्याचे"पान खाणे हा एक सोहळाच. "अन्या"साहेबांचा family पानवाला. त्यांनी एकवेळ family डॉक्टर बदलला असेल पण अन्या सोडून कुणाकडेही पान खाणार नाहीत – कुणी कितीही मानपान केला तरीही.

दाते साहेबांच्या गाण्याविषयी मी काही बोलावं एवढी माझी योग्यता नाही. मराठी भावगीतातला ते शुक्रताराच आहेत. साक्षात पुलंनी त्यांना गायला लावलं आणि मराठी कानसेनांवर आजन्म फिटणार नाहीत असे उपकार करून ठेवले. नाही म्हणायला पुलंनी मराठी रसिकांवर एकाच जन्मात इतके उपकार केले आहेत की समस्त मराठी रसिकांनी सात जन्म घेतले तरी ते फिटणार नाहीत. अफाट लोकप्रियता लाभलेले दाते साहेब कधीही स्वतःच्या गाण्याबद्दल बोलत नाहीत. किंबहुना"मी कुणीच नाही. मला गीतकार आणि संगीतकार असे मिळाले की त्यामुळे मी मोठा झालो"असंच त्यांचं विनम्र कथन असतं.

इतका विलोभनीय आविष्कार दुसरा सापडणं कठीणच. दाते साहेबांना रागावलेलं मी तरी क्वचितच पाहिले आहे. अगदीच एखाद्याने अक्षम्य गुन्हा केला तर ते म्हणतात –"तो वाह्यात मनुष्य आहे". खलास!

गाण्यांच्या मैफिलीचे किस्से आणि आठवणी त्यांच्याकडून ऐकणं म्हणजे nostalgia. त्या किश्यांमध्ये कोण डोकवत नाही – बाबुजी, खळे, पाडगावकर, लतादीदी, आशाबाई, बाळासाहेब, देव, किशोरीताई – किती नावं घ्यावीत? रामुभैया, कुमारजी आणि इंदूर या आठवणी तर साहेबांची खास मर्मबंधातली ठेव. जीवाचे कान करून त्या आठवणी ऐकताना साहेबांच्या डोळयात दाटलेला श्रावण दिसून येतो. साहेबांच्या मैफिलीत पाडगावकर, बाळासाहेब अशी थोर मंडळी भेटली. त्यांच्याशी ओळख झाली. त्यांच्या पायावर डोकं ठेवण्याची संधी मिळाली. जीव मोहरून गेला. केवढी मोठी माणसं ही. त्यांना इतकं जवळून पहायला, अनुभवायला मिळालं यापरतं आपलं भाग्य ते कोणतं? एक आठवण तर मी आयुष्यात विसरणार नाही. "झी सारेगमच्या"फायनलला गणेश कला क्रीडा मंदिरात साहेबांबरोबर गेलो होतो. साहेबांनी मला पहिल्या रांगेत त्यांच्या शेजारी बसवून घेतलं. माझ्या शेजारी आणि मागे गाण्यातले तमाम दिग्गज बसले होते. मला तर विलक्षण अवघडल्यासारखे झालं. पण साहेबांनी मला ठणकावून सांगितलं –"जिथे मी तिथे तू. जर यांच्याकडे दोघांना जागा नसेल तर आपण दोघेही मागे जाऊन बसू."मागच्या जन्मी मी असे काय पुण्य केलं आहे कुणास ठाऊक कीआजच्या या मायावी जगात दाते साहेब अशी माया माझ्यावर करतात?

मीना वहिनी आम्हाला ३० जानेवारी २०१२ रोजी सोडून गेल्या. दाते साहेबांनी हा घाव निमुटपणे सोसला. पाठोपाठ महिन्याभरात दाते साहेबांना हृदय-रोगाचे निदान झाले. इसीजी, आन्जिओ-प्लास्टी आणि शेवटी शस्त्रक्रिया या फेऱ्यातून साहेब तावून सुलाखून निघाले. शस्त्रक्रियेच्या आधी दोन दिवस आल्या-गेल्याला "आता मला नवीन हृदय मिळणार" म्हणून हसत हसत सांगणे हे फक्त त्यांनाच जमू शकते. शस्त्रक्रियेला जरा जास्त वेळ लागला तेव्हा अतुलचा (त्यांच्या मुलाचा) आलेला एसेमेस फार बोलका होता. . ."वेळ लागणारच! मेरे बाप का दिल जो इतना बडा है!"खरे आहे. इस से बडा सच तो हो ही नही सकता!

दाते साहेब आता आयुष्याच्या संध्याकाळी सुरेख विसावलेले आहेत. सुख दुःखाचे फेरे या जगात कुणाला चुकलेले आहेत? मग दाते साहेब तरी त्याला कसे अपवाद असतील? पण"जीवनाच्या सोहळयाला जायचे आहे, आतले आनंद गाणे गायचे आहे"या एकाच भावनेने ते आयुष्याला सामोरे जातात. भारलेल्या स्वरांनी भारलेला जन्मच त्यांचा. त्यांनी आपल्याला या जन्मावर आणि या जगण्यावर शतदा प्रेम करायला शिकवलं. दाते साहेब तुम्ही ह्या जन्मात तर शतक साजरं कराच पण हाच जन्म शतदा घ्या हीच "त्याच्या“ चरणी प्रार्थना!

श्रीधर पाठक

shreedhar@natupathak.com

# गहिऱ्या वेदनेचा नाथ

परिस्थितीशी चार हात करताना हजारात एखादाच जिंकतो. त्याच्या यशाचे कौतुक होते. त्याचे कष्टही गौरवाने मढवले जातात. पण या संघर्षात जे हरतात त्यांच्या चांगुलपणालाही नामुष्कीची शिकार व्हावे लागते. दुदैवाने तो हरला. गरीबीतही तो कधी लाचार नव्हता. अगतिक होता पण दीनवाणा नव्हता कधीच. दुष्काळातही विकतचा चारा घेऊन पोटच्या पोरांवानी सांभाळलेली बैलजोडी चोरीला गेली अन् मात्र कोसळलाच तो. धाय मोकलून रडू लागला. भांडवलाअभावी कोरडवाहू शेतात वर्षभर राबतात नवरा बायको गुराढोरांसारखे. वर्षाची अन्नधान्याची बेगमी होते कशीबशी. त्यात ही चोरी. साठ-सत्तर हजाराचं जिवंत धन रात्रीतून गायब. तोंडचा घास मातीत पडल्यासारखं.

नवनाथवर ओढवलेल्या संकटाची बातमी धाकटा भाऊ बाबूकडून समजली. मी सुन्न झालो. कशी सापडणार त्याची बैलजोडी? त्याच्या संसाराचा कणाच मोडलेला! कसा सावरणार? मी रात्रभर अस्वस्थ. कितीतरी वेळ डोळा लागला नाही.

शाळेत तिसरीत असतांना नवनाथने आमच्या वर्गात प्रवेश केला. कानात सोन्याच्या बाळया, गुटगुटीत शरीराचा, गोल चेहऱ्याला शोभणारे थोडेफार कुरुळे केस, साधेच पण स्वच्छ धुतलेले कपडे, नीटनेटके दप्तर असलेली पिशवी अशा वेशात स्वारी शाळेत दाखल झाली.

‘आज शाळेत जो नवीन मुलगा येणार आहे. तो मोठा अडबंग, मारकुटा आहे. कुणीही त्याचं नाव घ्यायचं नाही. त्याच्यापासून लांब राहायचं’

बाईंनी तो वर्गात येण्यापुर्वीच सावधानतेची सुचना वजा ताकीद त्याच्याबद्दल देऊन ठेवली होती.

पहिल्या दिवशी त्याला बाईंनी स्वतंत्र बसवलं. आम्हा विद्यार्थ्यांच्या तीन-चार रांगा असत. विद्यार्थीनींची एक स्वतंत्र. नवनाथची एकटय़ाची एक रांग झाली. आम्हाला 20 पर्यंतचे पाढे कसेबसे पाठ होते. नवनाथचे तीसापर्यंतचे सर्व पाढे पाठ. कुठलाही विचारा! गणित असो की कुठलाही धडा सगळयात आधी त्याचं उत्तर तयार. नावडत्याचा आवडता बनायला त्याला वेळ लागला नाही. पुर्वीच्या त्याच्या व्रात्यपणाची जागा आता समजदार विद्यार्थ्याने घेतली होती. जिथे तो एकटा बसला होता त्याच्या मागे आता मोठी रांग तयार झाली होती. लवकरच तो वर्गाचा मॉनिटर झाला. बाई वर्गात नसल्या की तोच पाढे, वाचन घेऊन शिक्षकाची भूमिका पार पाडी.

त्याची चपळाई इतकी की नुसता पाण्यातला ‘इरुळा’! सुरपारुंब्या खेळतांना झाडावर इतका सरसर चढे की खारुताईनेही लाजावं. माकडाच्या कुशलतेने एका फांदीवरुन दुसरी उडी घ्यावी ती त्यानेच. आम्हाला ‘मोगली, टारझन खूप उशीरा कळाले, त्यापुर्वीच नवनाथ आम्हाला माहित होता. कबड्डी, खो-खो, डोरल्या, आटय़ापाटय़ा, लिंगुच्र्या, विट्टीदांडू, गोटय़ा, भोवरा सगळयाच खेळांत तो अग्रेसर! त्याच्या पार्टीत खेळण्यासाठी पोरं सारखी त्याच्या मागे पुढे करत. मी आणि सुहास मंडलिक त्याचे खास मित्र. आम्ही दोघेही तब्येतीने तोळामासा मात्र त्याच्या मर्जीतले असल्यामुळे कच्चेलिंबू म्हणून कुठल्याही खेळात आम्हाला संधी मिळे.

नवनाथ येण्यापुर्वी वर्गात बऱ्यापैकी हुशार असलेले आम्ही दुसऱ्या तिसऱ्या क्रमांकावर फेकले गेलो. त्याच्या पहिला नंबर असला तरी दुसऱ्या नंबरच्या आमच्या मार्कात साधारण पन्नास-साठ गुणांचा फरक हमखास ठरलेला. आम्ही त्याचं अधिराज्य मान्य केलेलं. मोठेपणी हा शिकून खूप मोठा अधिकारी वगैरे बनेल असा शिक्षकांसह आम्हा सगळयांचाच अंदाज नव्हे खात्रीच होती.

त्याची घरची परिस्थिती हलाखीचीच होती. कारभार आजोबांच्या हाती. वडीलांचं घरात काही धकत नसे. आई बिचारी घरी-शेतात रात्रंदिवस राबणारी. त्या कोवळया वयातही नवनाथ स्वत: पाटी-दप्तर, वह्या, पुस्तकांपुरते पैसे इथे तिथे मिळेल ती कामं करुन कमवायचा. शाळा सुटेपर्यंत त्याचा हा नित्यक्रम राहिला. त्याच्या घरी चहा बनत नसे. सणावारी गोडधोडही क्वचितच. स्वतःचे कपडे तो स्वतःच धुवायचा. जेवण स्वतः वाढून घेऊन नंतर ताटही विसळून स्वच्छ करुन ठेवायचा. आम्हाला हे सगळंच नवीन होतं.

घरुन गंध-पावडर, भांगपट्टी करुन आईने तयारी करुन दिल्यावर वर्गात येणारी आम्ही मुले अन् स्वतःचं स्वतः आवरुन येणारा तो! तरी तो निश्चितच खूपच नीटनेटका वाटायचा! त्याच्या साध्या कपडय़ांनाही स्वतःची चमक होती. त्याची पुस्तकं छान कव्हरं घातलेली. वह्या सुरेख अक्षर मोत्यासारखं. आम्हा तळयातल्या बदकांमध्ये ‘तो एक राजहंस’ वाटायचा!

पण कुठेतरी बिनसलं. सातवीत एका मार्कावरुन त्याचा पहिला नंबर हुकला अन् तो उतरणीला लागला. आठवीला पाचव्या सहाव्या क्रमांकावर घसरला अन् दहावीला तर तो पासही होती की नाही अशी स्थिती. पास झाला कसाबसा पण शिक्षणात रस उरला नाही. निराशेच्या गर्तेत तो रुतत गेला. त्याला न्युनगंडाने पछाडलं अन् आम्हा मित्रांशीही तो फटकून वागत राहिला.

नोकरीसाठी धडपड करुन पाहिली. हेल्पर म्हणून एम आय डी सी मधील छोटय़ा मोठय़ा कंपन्यांत रोजंदारीवर कामंही केली पण सतत मिळणारे ब्रेक अन् तिथली अशाश्वतता त्याला पुन्हा गावाकडे घेऊन आली. कोरडवाहू का होईना पण काळया आईच्या संगतीत रमला. दुदैवानं हाताशी आलेल्या लहान भावाचं अपघाती निधन झालं. त्यात तो पुरता खचला. बहिणीच्या लग्नाची जबाबदारी शिरावर येऊन पडलेली. पुन्हा अंग झाडून कामाला लागला. कर्ज काढून परिस्थितीला साजेसं तिचं लग्न लावून दिलं. आईची या प्रवासात खंबीर साथ मिळाली. यथावकाश लग्न झालं पोरं झाली अन् दरवर्षीचा पावसाच्या भरवशावर चालणारा शेतीचा जुगार त्याच्या कपाळावर गोंदला गेला.

देवानं गाऱ्हाणं ऐकावं तशी त्याचे हरवलेले बैल सापडल्याची बातमी वर्तमानपत्रात छापून आली. चोरटे बैल विक्रीला घेऊन गेले असतांना सौदा करुन पसार झाले पैसै न घेता. बेवारस स्थितीतल्या बैलांची ती बातमी वाचून आम्हा सर्वांचा जीव भांडय़ात पडला. नवनाथ तर अगदीच गलबलून गेला. पोटच्या पोरांसारखी सांभाळलेली बैलजोडी पुन्हा त्याच्या खळयात परतणार होती. पोळा पंधरा दिवसांवर येऊन ठेपला असतांना रिकामी झालेली त्याची दावण पुन्हा भरणार होती. . . लक्ष्मीची पाऊलं पुन्हा उमटणार होती.

वडीलांच्या नोकरी निमित्त आमच्यात शिकलेले दोन वर्ग मित्र सुहास मंडलिक अन् सुभाष वाघ हेही नवनाथच्या मदतीला धावून आले. मालेगावात राहत असल्याने बालपणीच्या मित्राला मदत करण्यासाठी संकट समयी धावून आले. अनोळखी गावात बालपणीचा जिव्हाळा जपत भेटलेल्या मित्रांमुळे त्याचा आनंद शतपटीने वाढला. हरवलेल्या बैलांच्या किंमतीपेक्षा या मैत्रीचं मोल कितीतरी मोठं होतं.

किरण भावसार

वडांगळी, सिन्नर

kiran@enzymeindia.com

# भुर्र

लहानपणी आम्ही एक खेळ खेळायचो. ज्याच्यावर डाव असे तो पक्ष्यांची नावे घेई. . कावळा, चिमणी, पोपट. . . त्याने कावळा म्हटले की आम्ही सगळे भुर्र म्हणायचं. मग मध्येच तो ससा किंवा सिंह असे म्हणायचा. जर कोणी भुर्र म्हटले तर त्याच्यावर डाव जायचा. काल सहजच या खेळाची आठवण झाली व मनात खुदकन हसले. त्यावेळी आम्ही कधीही 'दिवस' हा शब्द उच्चारला नाही. दिवस म्हटल्यावर भुर्र म्हणायचे की नाही हा मोठा प्रश्न पडला असता.

तोच डाव जर आज खेळलो तर निर्विवादपणे 'भुर्र' च म्हणावे लागेल. कधी शाळा कॉलेजचे दिवस सरले, नोकरी लागली, लग्न झाले,मुले झाली. बघता बघता ती मोठी झाली आणि काल परवा म्हणता म्हणता प्रकर्षाने जाणवले की त्या ओघात आपणही 'दिवस' भुर्र म्हणायचे सुद्धा विसरून गेलो. ज्या मुलाचा पहिला वाढदिवस आपण बघितला तोच आज डॉक्टर किंवा प्रोफेसर म्हणून समोर येतो व जीव हबकून जातो. अरेच्या! मैथिलीचा मुलगा एवढा मोठ्ठा झाला? विश्वासच बसत नाही. सतत नमस्कार करून आशीर्वाद घेणाऱ्या आपल्या डोक्यात अचानक प्रकाश पडतो की आता आशीर्वाद देणारी मंडळी खूपच कमी झाली आहेत आणि आपणच आता आशीर्वाद द्यायच्या वळणावर येऊन थबकलो आहोत.

देणाऱ्याने देत जावे, घेणाऱ्याने घेत जावे,
घेता घेता एक दिवस घेणाऱ्याने
देणाऱ्याचे हात घ्यावे

- या विंदा करंदीकरांच्या ओळी कितीदातरी ऐकल्या बोलल्या असतील पण आता जेव्हा मुले दहावीच्या निकालाचे पेढे घेऊन येतात तेव्हा सहजच आपले दिवस आठवतात व आपण खिशात हाथ घालून त्याला पैसे देऊन भरपूर कौतुक व आशीर्वाद देतो. मन मात्र आपल्या दहावीत रमून गेलेले असते. शाळेतली ती मज्जा मस्ती अनुभवत असते. अवधान येते पण मन रुंजी घालतच असते.

अशा गोजिरवाण्या दिवसांना कधी कधी वर्तमानाचा चटका सुद्धा लागतो बरं का. शेवटी हा साप शिडीचा किंवा झोक्याचा खेळच की. कधी वर तर कधी खाली. खाली असलो तर वर जायची धडपड आणि वर असलो तर गालावर खेळणाऱ्या मंद झुळूकेचा आनंद. असाच एक एक दिवस आपण जगत असतो, दिवसांची वर्षे होतात, वर्षांची दशके आणि मग आपण म्हणतो - याला जीवन ऐसे नाव.

पण एका गोष्टीची जाणीव असेल तर सरती वर्षे सुद्धा सुंदर होतात. मन जर सत्तरीत षोडशवर्षा राहिले तर वर वर वाटते की आपण मनाने तरुण आहोत व हेच महत्वाचे. परंतु त्या स्थितीत सुद्धा वर्तमानाचे भान नसेल तर हसेच होते नाहीतर निराशा पदरी पडते. मी मध्ये एकदा एका ऐंशी वर्ष्यांच्या आजी बाईना भेटले होते. त्या शास्त्रीय संगीताच्या विशारद होत्या. त्या वयातही नवीन राग, सूर, ताल व चालींच्या सतत शोधात असायच्या. मला त्यांच्या या उत्साहाचे खूपच आश्चर्य वाटायचे. शेवटी न राहवून मी त्यांना त्याबद्दल विचारले. त्या जे म्हणाल्या त्याने मी अवाकच झाले. त्या म्हणाल्या - अगं ही पैशाची पुंजी वर थोडी घेऊन जाणार? शेवटी संस्कारच आपल्या बरोबर येणार - ही पुढच्या जन्माची तयारी आहे. वेळ अगदी थोडा आहे त्यात जेवढे जमवता येईल तेवढे जमवायचे.

एकीकडे त्या आजीबाई तर  दुसरीकडे बालगंधर्वांचे उदाहरण.  आपल्या शिदोरीत किती व कसे जमा करायचे हे ज्याच्या त्याच्या मनावर अवलंबून.  आणि म्हणूनच काही म्हणतात :कालाय तस्मै नमः, तर काही त्या काळावरही विजय मिळवतात.

अनघा हुन्नुरकर.
amrutahunnurkar@yahoo.com

# किरवंत

सूर्य डोक्यावर येऊन तिथेच स्थिरावला की काय? काय हे देणाऱ्याने तरी घरून निघाल्यावर या म्हणून निरोप द्यावा ना, पण नाही. अजून कोणाचा पत्ता नाही. आम्ही निरोप दिल्यावर गुरुजी मात्र वेळेवर हाजिर पाहिजे, आम्ही केव्हाही आलो तरी चालेल. ही माजोरी. कोणाची ना कोणाची वाट बघण सुरु असेल. मुंबईहून गोखल्याचा मुलगा व सून स्पेशल गाडी करून निघालेत म्हणे. म्हणजे कमीत कमी चार तासांची निर्चिंती. आल्यानंतर कमीत कमी एक तास तरी जातोच हो. तो पर्यंत घरी पुन्हा जाऊन परत यावे, तर घर इतक्या लांब की तेही शक्य नाही. इथेच आता मंडळी येई पर्यंत उन्हात ताटकळत बसण्याशिवाय पर्याय नाही, चला. शिवाय हल्ली अशा वेळेला माणस जमतात कुठे म्हणा. गोखलेच्या हापिसातील त्याच्या वेळची जी काय चार पाच रिटायर टाळकी शिल्लक असतील तेवढीच. बाकीचे आसपासचे काय जमतील त्यांची शाश्वती नाही. आजकाल रजा टाकायला लोकांची तयारी नाही हे खर. बातमी कळल्यावर नुसते एकदा डोकाऊन जातील. हल्ली ती शववाहिनी आल्या पासून एक बरे झाले हो, खांदेकरी तरी जमतील की नाही ही भीती नाही. शिवाय इथे आल्यावर देखिल डिझेलची भट्टी. पंधरा मिनिटात राखेचा डबा नातेवाईकांच्या स्वाधीन. अरे पण,शास्त्रशुध्द चिता देखिल रचावी लागते. ती ही एक कला आहे. आता हा गंगाधर किती दिवस मदत करणार बाबांनो, म्हटल,तर एक जण शिंचा पुढे येऊन शिकायची तयारी दाखवत नाही. घाबरट लेकाचे. आता तो मेलेला काय तुला येऊन विचारणार आहे कां, की बुवा डोक्यावर एवढ जड लाकूड कां ठेवलं ते? पण कवटी नीट जळायला चांगल मोठ,जड लाकुडच डोक्यावर ठेवावं लागत, हे कोण सांगणार? असो.

आताशा डिझेल भट्टी आल्याने ती पण एक काळजी दूर झाली. अजून कोणी कसे आलेल दिसत नाही? मंत्राग्नीच्या साहित्याची यादी नेली आहे खरी, त्या प्रमाणे सगळ्या गोष्टी आणल्या म्हणजे झाल, तसा दामल्यांचा चा विनू अनुभवी आहे म्हणा. चुकणार नाही. नाहीतर त्या कुल्कर्ण्याच्या दिनकरने केला तसा घोळ.

यादी नेली नाही, आणि हेऽऽ सामान घेऊन आला. मी आपला पिशवीतून एक एक वस्तू बाहेर काढतो तर काय. नारळ, पाच फळे, विड्याची पाने, सुपार्या,केळीचे खांब, रामा शिवा गोविंदा. अरे इथे स्मशानात काय सत्यनारायणाची पूजा घालायची आहे की काय? आणि मुख्य स्मशानश्राध्दाचे सामान कणिक,काळे तीळ, तूप, पंचे, कापूर, फुले,तुळशीपत्र पळी पंचपात्री याचा पत्ता नाही. तसाच रात्रीचा पिटाळला पुन्हा गावात आणि आणले सामान, तर अशी एकेक वेळची मजा झाली.

मी किती वेळ ताटकळत बसलो काय माहिती. थोड्या वेळाने आघाडीची मंडळी येऊन पोहोचली. त्यांच्या बरोबरच लाकडाची आणि शेण्याची गाडी कुरु कुरु करत येऊन उभी राहिली. बाजूच्या शेड मध्ये सर्व सामान उतरून घेतले व माझ्या मार्गदर्शनाखाली मंडळी चिता रचायला लागली."सगळयात खाली मोठी आडवी आणि त्यावर उभी रचा रे. बारीक लहान सहान फांद्या,धल्प्या वर घालायला ठेवा."माझ्या सुचना चालू होत्या. एव्हाना यात्रा येऊन पोहोचली.

गोखल्यांचा विद्याधर समोर येऊन बसला. "चल, पटकन एका पंचा नेसून घे , दुसरा असा जानव्यासारखा घाल. तो पर्यंत अनंतराव तुम्ही पाणी आणा अन लगोलग कणकेचे पिंड तयार करायला घ्या. अरे,पाणी बेताने घाल. कणिक थोडीच असेल. विद्या तू आचमन कर. केशवाय नाम:, नारायणाय नम:. . . . . . सरावाने माझी गाडी सुरु झाली. "हं हातात पाणी घे. . म्हण. मम पितु: शांडिल्य गोत्रोत्प्न्नस्य,नारायण प्रेतस्य, उत्तम, लोक, प्राप्यर्थं, दाह संस्कार सिध्यर्थं शरीर शुद्धीं. . . ."

एकेक शब्दाने विधी पुढे सरकत होता तसतसा मी एकेक वर्ष मागे मागे जात होतो. किती वर्ष लोटली, अप्पांबरोबर पहिल्यांदा घाटावर मंत्राग्नीचा विधी सांगायला आलो तेव्हा मनात किती तरी वेळा येऊन गेल, हे बरोबर करतोय ना, आता हेच काम कायमच चिकटणार ह्याची तेव्हा कुठे कल्पना होती? आप्पांची इच्छा होती, आपल्या नंतर घरातील मोठ्या मुलाने ही परंपरा चालू ठेवावी. गेल्या चार पिढ्यांशी इमान राखावं. मी पण त्यांच्या इच्छेला नाही म्हणू शकलो नाही. सगळे विधी,शास्त्र, नीट समजून शिकून घेतले. वयोपरत्वे आप्पाना घाटावर येणे कठीण होऊ लागले तशी मीच त्यांची जागा हळूहळू घेत गेलो. इच्छा असून देखिल कॉलेजचे शिक्षण पुढे चालू ठेवू शकलो नाही.

पहिल्यापासून माझे संस्कृत चांगले, अप्पांचे मित्र म्हणायचे,"आप्पा अरे हा कालेजात शिकून संस्कृतचा चांगला प्रोफेसर होईल हो" आप्पांनी जाहीर करून टाकले,"ते कालेजच काय ते तुझे तू बघ हो, माझे हात पाय आता चालत नाहीत, मला तो खर्च झेपायचा नाही. माझ्या पश्चात बापूचे शिक्षण,शरयूचे लग्न याची जबाबदारी पण तुझ्यावर आहे, याचे भान असू दे म्हणजे झाले." पण कसचे काय, कॉलेजचा विचार मागे पडला तो पडलाच. त्यातून आमच्या या कामाला ठराविक वेळ, काळ याचे बंधन थोडेच? सकाळ, दुपार, रात्र,,उन, पाउस, थंडी, कशाचे म्हणून बंधन नाही. आला निरोप की डोक्याला टापशी बांधा, पंचांग पाहा,घ्या दर्भाची जुडी हातात अन् निघा. तिथे कॉलेजच्या वेळा कशा जमणार? समजूतदार माणस असली तर रिक्षात नेतात, नाही तर आहेच पायपीट. बरे एवढे करून दक्षिणा तरी समजून, बरी व वेळेवर दिली तर शपथ. मागे एकदा एकाची आई गेली तर, निरोप दिला दुसऱ्याने, दक्षिणा द्यायची वेळ आली तशी लागली एकमेकांकडे बोटे दाखवायला. मला कळेना, कोणाकडे विषय काढावा. संकोचाने ज्याने निरोप दिला त्याच्याकडे हळूच विषय काढला तशी उसळून माझ्यावरच खेकसला. "ज्याची आई गेली त्याच्याकडे माग जा." जणू मी काय भीक मागत होतो. आता अशा परिस्थितीत त्याच्याकडे जाणे प्रशस्त वाटेना. त्यांच्या कडले सर्व दिवस पाणी आटोपल्यावर एक महिन्यांनी गेलो तर त्यांनी मोठ्या तुच्छतेने माझ्याकडे बघत एक दहा रुपयाची नोट भिरकावली व म्हणाले"या, आम्ही काय पळून नव्हतो चाललो. तुमचे पैसे बुडवून, आले लगेच पैसे मागायला

"खाली पडलेल्या त्या नोटेला हात लावावासा वाटत नव्हता. त्यांच्या साठी भर उन्हात तीन मैलाची वाट तुडवत घाटावर गेलो तिथे दोन तास घालवले,त्याची किमत फक्त दहा रुपये! वाटल, त्यांच्या तोंडावर अमिताभचा ‘तो‘ प्रसिध्द संवाद फेकावा.

"और, आज भी मै फेके हुवे पैसे नही उठाता !"

पण धीर झाला नाही. आप्पांचे संस्कार आड आले. "हे पुंण्याचे काम आहे, जे काही मिळेल त्यात समाधानी रहा. म्हणजे तुला काही कमी पडणार नाही.“ **गरजवंताला अक्कलच काय अभिमान पण नसावा?** ही शिकवण मिळाली.

"नाही, म्हणजे जरा अडचण होती, म्हणून आलो." कसनुसे तोंडातून शब्द बाहेर आले. “सगळी लाज बाजूला सारून पैसे उचलले व घरी आलो. शरयूच्या टायपिंग क्लासची दोन महिन्याची फी राहिली होती, त्यासाठी ही धडपड. बापू,शरयू दोघे हुशार आहेत. आपल्याला नाही तरी लहान भावंडांच्या शिक्षणाची आबाळ होऊ नये, यांनी खूप शिकावं,मोठ व्हावं, ही अंतरीची तीव्र इच्छा सगळे अपमान गिळायला लावत होती. त्याशिवाय दुसरा काय पर्याय माझ्याकडे होता?

दिवसा मागून दिवस भराभर चालले होते. आप्पांचे घाटावर जाणे आताशा पूर्ण थांबले होते. घरची सगळी जबाबदारी माझ्यावर होती. आईचे अंथरूण आता वरच्या माडीवर हलवले होते. तिला तिच्या दम्याने नकोसे केले होते. त्यातून आप्पांची चिडचीड.

बापूने मात्र चिकाटीने बी. कॉमची चार ही वर्षे पूर्ण केली. आता त्याला सी. ए. व्हायला पुण्याला जायचे होते. मी म्हटले जा, माझ्याच्याने जे शक्य असेल ते सर्व मी करीन,पण तुझे शिक्षण पूर्ण कर. बापूने पण मेहनत करून माझ्यावर पश्चात्तापाची वेळ येऊ दिली नाही

चारच वर्षात तो सी. ए. झाला. पुण्याला एका फॉरीन कम्पनीत चांगल्या पगाराची नोकरी पण त्याला मिळाली. तिथेच कोथरुडला त्याने एक घर घेतले. आताशा बापूचे गावी येणे कमी कमी होऊ लागले तशी आईला व आप्पांना त्याची जास्त ओढ वाटू लागली. त्याच्या लग्नाचे आता बघायला हवे असे माझ्यामागे आडून सुचवणे सुरु झाले. तसे बघितले तर मी बापू पेक्षा मोठा, पण मी त्याना दिसत नव्हतो. बापूच्या पाठची शरयु देखिल आता लहान राहिली नव्हती. तिच्या लग्नाचे खर तर आधी बघायला हवे होते. पण बापूचा पैसा, त्याने स्वतः घेतलेले घर, त्याची येऊ घातलेली गाडी याची त्याना जास्त भुरळ पडली होती.

शरयू तशी दिसायला फार काही सुरेख वगैरे नाही, चार चौघीसारखी आहे. पत्रिका मात्र फार चांगली आहे. जाईल त्याघरी राज्य करील अशी. बी. कॉम. फर्स्ट क्लास पास होऊन घरीच आहे. हल्ली ब्राह्मणांना सरकारी नोकर्या कुठून मिळणार, जिथून तिथून नन्नाचा पाढा. दिवसा गॅसच्या दुकानात नंबर लावायची नोकरी करते अन् संध्याकाळी केळकर हॉस्पिटल मध्ये पेशंटचे नंबर लावायचे काम करते. तिच्या परीने ती आप्पांच्या संसाराला हातभार लावायचा प्रयत्न करते झाले. खरे तर तिच्या वयाच्या मुलींची लग्ने केंव्हाच होऊन गेली. आता परवा कल्याणच्या सान्यांकडे दाखविण्याचा कार्यक्रम झाला, पण वडील काय करतात विचारल्यावर आप्पांचा व्यवसाय ऐकल्यावर मंडळी बिथरली. वडील भाऊ पण हेच काम पुढे करतो ऐकल्यावर तर एकेकांचे चेहेरे पाहण्यागत झाले. "किरवंताची मुलगी करून घ्यायला आमचा मुलगा काय वाटेवर पडलाय? का लुळापांगळा आहे? आमच्या सारख्या घरंदाज घराण्यात, मी म्हणते, यांच्यासारखं स्थळ आणलंच कसं तुम्ही?“ मुलाची आई मध्यस्थावर फणकारली. किरवंत!!! जणू काय आम्ही फासावर चढविणारे जल्लाद आहोत. आता आम्ही करतो हे काम करायला पण तर कोणी ब्राम्हण पाहिजे ना? नाहीतर द्या म्हणाव, नुसता भडाग्नी, पण नाही. तिथे ते "उत्तमलोक प्राप्यर्थं“ तेही पाहिजे. अशा वेळी जीव अगदी कावून जातो.

काळ कोणासाठी थांबत नाही. माझं पण लग्नाचं वय हळू हळू उलटून चाललं होतं. शरयूच लग्न ठरण्याचे चिन्ह लवकर दिसेना, तशी बापूने त्याच्या लग्नाचा प्रश्न आपला आपण सोडवला. त्याच्याच ऑफिसमध्ये काम करणाऱ्या एका कानडी मुलीशी त्याने लग्न ठरवले. लग्न रजिस्टर पद्धतीने झाले, मुलीला वडील नाहीत, त्यामुळे आमच्या किरवंत असण्याला तिच्या कडच्या कोणाचा फारसा विरोध झाला नसावा. आई आणि आप्पांच्या लेखी बापू कौतुकाच्या विषयात आणखी भर पडली. त्याच्याकडे नवीन घरात ते एक महिना जाऊन राहून आले.

शरयूसाठी स्थळ शोध मोहीम व त्यासाठी माझी धडपड चालूच होती. त्यातच एक बिजवराचे स्थळ सांगून आले. मी समजावयाचा प्रश्न आला नाही. शरयू फार समजूतदार निघाली. आपली परिस्थिती पाहून तिने स्वत: होऊन होकार दिला. शिवाय जमेची बाजू म्हणजे त्याना किरवंत चालणार होते. आमच्या बाबतीत सर्व सरळ होऊन कसे चालले असते? लग्नाच्या बैठकीत त्यांनी हुंड्यासाठी आग्रह धरला. एवढी रक्कम मी कसा काय देवू शकणार होतो? शिवाय लग्नाचा खर्च आम्हालाच करायचा होता. पुन्हा एकदा बापूचे पाय धरणे आले. मोठ्या मिनतवारीने पैसे द्यायला तो तयार झाला. शरयूच्या लग्नासाठी आधी व नंतर लग्नात धावपळ, कष्ट करायाला मी, पण "शरयूच लग्न बापुमुळेच झाले हो," हे कौतुकाचे शब्द आई आप्पांकडून ओळखीच्यांच्या कानावर पडू लागले. लग्नात बापूने केलेल्या खर्चामुळे आप्पा त्याचे मिंधे झाल्यागत वागू लागले होते. आप्पांची इच्छा डावलून बापू सी. ए. करतांना ते कसे वागत होते ते मला आठवले. त्याच आप्पांच पान आता बापू शिवाय हलत नव्हत. कानडी मुलीशी लग्न केल्याने हिरमुसलेली आई तिच्याशी चार शब्द धड बोलत नव्हती, तीच आई आता तिने केलेया इडली साम्बाराचे कौतुक करताना थकत नव्हती. कालाय तस्मै नम:

मनात इतकी खंत वाटत होती पण काय करणार? ना समाजात वावरतांना कुठे मान, ना खिशात पैसा. सतत किरवंतपणाचा शिक्का कपाळावर घेऊन वावरायचं. सरकार दरबारी जात मात्र ब्राह्मण ! त्यामुळे इतर सवलतींना पारखे. कारण आमची जात उच्च म्हणून गणली गेली !

नेहमीच्या सवयीने मध्येच प्रेत संस्कारांचे मंत्र उच्चारले गेले तर नकोच ते अमंगळ म्हणून कोणी कधी पूजा, लग्नविधी सांगायलाही बोलावत नाहीत. दिवस रात्र एका अमंगळ सावलीखाली सतत जगायचं. जिवंतपणी सोबत असणार ती फक्त प्रेतांशी आणि सरणाशी. हेच आता आपले आयुष्याचे सोबती ही खूण गाठ मनात पक्की बांधायला हवी. अंधार दाटून आला आहे बाहेर आणि मनात देखिल. कारण मी आहे एक किरवंत.

( * ब्राह्मण समाजात अंत्यविधीचे मंत्र सांगून मंत्राग्नी देण्याचे काम करणार्या ब्राह्मणांना ‘ किरवंत ‘ (क्रिया कर्म करणारे) या नावाने ओळखले जाते. )

अरुण लेले

lele.arun@mungiindia.com

# निर्माण… Youth for purposeful life.

"माझी मूल्य, तत्वं ह्यांपसून मी दुरावते आहे.. माझा पेशन्स संपत चाललाय. विस्थपित होतोय; का ते माहीत नाही. मी कशात करीअर करायचं; मला कशाची आवड आहे,माझं शिक्षण, कॉलेज हे मी माझं ठरवलं तरी मी एव्हढी अस्वस्थ का?“ हे आणि असं बरच काही डायरीत लिहिणं चालू असायचं म्हणजे कॉलेज मध्ये असताना ही अस्वस्थता असायचीच पण जॉब ची भाबडी आशा सोबत करायची.. जॉब नंतर मात्र, आजुबाजुच्या परीस्थितीचा माझ्या शिक्षणाचा, जॉबचा, परिस्थिती बदलावी असं वाटण्याचा कशाचाच कशाशी ताळमेळ बसत नव्हता! मनाला पडणाऱ्या कुठल्याच प्रश्नाचं उत्तर मिळत नव्हतं! आपल्याला तर खूप वाटायचं आपण स्वत:ला ओळखतो! मग तरी एव्हढा परकेपणा का वाटतोय??

ह्या प्रश्नांच्या शोधात असतानाच वर्तमानपत्रातून निर्माण बद्दल वाचलं. Nirman. Youth for purposeful life. बातमीत थोड्याफ़ार फ़रकाने माझंच म्हणणं मांडलं होतं आणि त्यासाठी शिबिरं वगैरे होती! तेही गडचिरोलीला! शिक्षणाची अट नाही.. वयोमर्यादा १८-२८.. सोबत वेबसाईट.. इथेही निवड प्रक्रिया! फ़ॉर्म बघितला; नुसते प्रश्न वाचले आणि माझ्या मनानेच मला सगळे प्रश्न विचारल्या सारखं वाटलं! पहिल्यांदाच मी स्वत:ला सगळी खरी खरी उत्तरं दिली. त्यासाठी सुद्धा हिम्मत लागते, याचीही जाणीव होत गेली. खूप अंतर्मुख होत गेले. मी करत असलेल्या कामाचा सोशल रीलेवन्स काय हेच कळत नसल्याने ती अस्वस्थता होती. फ़ॉर्म भरून पोस्ट केला. आणि इन्टर्व्ह्युसाठी मनापासून वाट बघू लागले.. मला ह्या ग्रुपला निदान एकदा भेटायचंय असं प्रकर्षाने जाणवत राहिलं

दरम्यान डॉ. अभय बंग आणि डॉ. राणी बंग हे गडचिरोलित सामाजिक कार्य करतात ह्या पलिकडे त्यांची मला फ़ारशी ओळख नव्हती.. मग वेबसाईट वरून जेवढी माहिती वाचता येईल तेवढी रोज वाचत गेले. डॉ. अभय बंग ह्यांचं पुस्तक वाचलं.. कित्येक प्रश्नांची उकल होत चालली होती. नुसत्या वाचनानेच आत्मविश्वास वाढत गेला. स्वत:ला सापडण्याची प्रक्रिया सुरू झाली. इंटर्व्ह्युसाठी आणि महिन्याभराने शिबिरासाठी निवड झाल्याचं कळलं.. तो दिवस तर फारच आनंदाचा होता!

ठरल्याप्रमाणे "निर्माण“ च्या पहिल्या शिबिरासाठी आम्ही शिबिरार्थी "शोधग्राम“ मध्ये रुजु झालो आणि पहिल्याच दिवशी त्या मातीत रुजलो!

"काय करणार त्या शिबिरांमध्ये नक्की?? खरंच काही गरज आहे का?? हे काय समाज कार्याचं वय झालं का?? ह्या व अशा बऱ्याच प्रश्नांचं खणखणीत उत्तर म्हणजे शोधग्राम! 'स्व' चा शोध.. म्हणून शोधग्राम!

अत्यंत स्वच्छ परीसर.. निसर्गाशी आणि तिथल्या आदिवासी संस्कृतीशी अस्सल नाती संगणाऱ्या भक्कम वास्तुरचना.. पुढे शिबिरातल्या एका भागात ह्या सगळ्याची जवळून ओळख झाली, आणि इथला वापरला गेलेला इंच इंच नायना, अम्मा आणि तिथल्या प्रत्येकालाच अधिकाधिक उंचीवर नेत गेला. नायना (वडील) म्हणजे डॉ. अभय बंग आणि अम्मा (आई) म्हणजे डॉ. राणी बंग

मी शिबीर असा जरी उल्लेख करत असले तरी, निर्माण ही एक शिक्षण प्रक्रिया आहे. कारण "स्व“ चा शोध हा एक किंवा तीन शिबिरांएवढा मर्यादित असूच शकत नाही. पण आज जसं आपण बाहेर शिक्षणाचा बाजार बघतो तशी ही प्रक्रिया बिल्कुलच नाही. ह्या शिक्षण प्रक्रियेला निश्चित असं समाजाभिमुख उद्देश आहे. ज्या मध्ये आधी कसं शिकायच आणि का शिकायचं हे शिकवलं जातं. 'माझ्या ज्ञानाचा आणि व्यावसयिक कौशल्यांचा उपयोग समाजातल्या वेगवेगळ्या समस्यांना सोडवण्यासाठी करायचाय; असं वाटणाऱ्या युवक-युवतींना ओळखणं, त्यांना योग्य मार्गदर्शन, दृष्टिकोन आणि अनुभव घेण्याची संधी देणं, त्यांना organize करणं हे निर्माणचं उद्दिष्ट आहे.

शिबिरादरम्यान लहान मोठ्या अनेक गटकृतींमधून स्वत:कडे आणि समाजाकडे बघण्याच्या दृष्टिकोनात समृद्ध भर पडत गेली. महाराष्ट्रातल्या २६ जिल्ह्यांमधून आलेले, प्रत्येकाचं शिक्षण, अनुभव वेगवेगळे असे आम्ही सगळे निर्माणी शिबिराचे दाही दिवस संपूर्ण समरस होऊन जगलो.

दर सहा महिन्यातून एक अशी तीन शिबीरं मिळून निर्माणचं एक सत्र पूर्ण होतं. अशी आजवर ४ सत्रे यशस्वी रित्या पार पडली असून सध्या "निर्माण ५" चालू आहे. १-४ ह्या सत्रां मध्ये सहभागी झालेले निर्माणीच निर्माण शिबिरांचे समन्वयक म्हणून काम बघतात. ह्या संदर्भात संपूर्ण माहिती व संपर्क **www. nirman. mkcl. org** ह्या वेबसाईट वर उपलब्ध आहे.

**-अमृता ढगे.**

dhage. amruta@gmail. com

तत्पुर्वी शोधग्राम मधल्या सोलार प्लांटसाठी व एकुणच उर्जा निर्मीती क्षेत्रात काम करणाऱ्या एका निर्माणिची ऒळख करुन घेऊयात.

# शोधग्राम सोलर पॉवर प्लांट

माझं नाव मयुर सरोदे; राहणारा नाशिकचा. असं म्हणतात की लहानपणाच्या काही आठवणी आयुष्यभर मनात साठून राहतात. सुट्ट्यांमध्ये जळगावला काकाकडे गेल्यावर पाण्याची आणि विजेची कपात मी जवळून पाहिली. लाईट गेल्यावर होणारी तळमळ, आठवडाभरानंतर पाणी आल्यावर ते भरण्यासाठी होणारी धावपळ माझ्या मनात घर करून गेली. मग त्यावर "मला काही करता येईल का? मी ह्यावर काही उपाय करू शकतो का" हा विचार माझ्या वयाबरोबरच विस्तारत गेला. आणि त्याच विचाराने झपाटलेला, इंजिनियर झालेला मी अपारंपारिक उर्जा स्त्रोत या क्षेत्रात काम करण्यासाठी सज्ज झालो.

मी२०१२ मध्ये व्ही. एन. आय. टी. नागपूर इथून बी. टेक. केलं. कॉलेजच्या सांस्कृतिक कार्यक्रमात नेहमीच सक्रिय सहभाग घ्यायचो. त्यानंतर कॉलेजमध्ये रक्तदानाचा उपक्रम नव्याने सुरु केला. त्यामध्ये रक्तदानाचे शिबीर घेतले आणि कॉलेज मधल्या विद्यार्थ्यांमध्ये रक्तदाना विषयी जागृतीचं काम केलं. कॉलेजच्या मासिकासाठी संपादक म्हणूनही काम केलं. असे विविध कार्यक्रम चालू असतानाच ‘विज्ञान भारती’ नावाच्या संस्थेचा कॉलेजमध्ये कार्यक्रम होता त्यासाठी ‘उर्जा कार्यक्षम गाव’ असं छोटं मॉडेल उभारण्याची संधी मिळाली. ते बनवताना त्या विषयावरची पुस्तक वाचली. त्या निमित्ताने उर्जा आणि पर्यावरण यासारख्या विषयांमध्ये रस वाटू लागला. त्यादरम्यान मित्राकडून गप्पांच्या ओघात ‘निर्माण’ ह्या डॉ. अभय व राणी बंग यांच्या उपक्रमाविषयी समजलं. निर्माणचे शिबीर अनुभवतांना अनेक समविचारी मित्र मैत्रिणी भेटल्या आणि ‘माझं आयुष्यातलं ध्येय काय?’ ह्यावर विचार सुरु झाला.

तोपर्यंत विज्ञान भारतीचे वेगवेगळे कार्यक्रम ऐकणं, तिथे जाणं सुरु होतं.  मग त्यातूनच कॉलेजच्या शेवटी विज्ञान भारतीचा अर्धवेळ कार्यकर्ता ही भूमिका मी पार पाडत होतो.  एव्हाना कॉलेज मध्ये वेगवेगळया कंपन्यांकडून नोकरीच्या संधी येत होत्या.  पण मला नोकरी करायची नव्हती.  त्यामुळे निवड होऊनही मी कंपनीत नोकरी केली नाही.  ‘एकतर नोकरी कर किंवा पुढे शिक’ असा घरच्यांचा ओरडा चालू होता.  पण माझ्या मनात मात्र वेगळचं काहीतरी आकार घेत होतं. कॉलेज संपताच विज्ञान भारती चा पूर्णवेळ कार्यकर्ताम्हणून मी कामाला सुरुवात केली. त्याच संस्थेच्या ‘उर्जा इंडिया’ या त्रैमासिकाचा निर्माणकर्ता आणि संपादक म्हणून मी काम केलं.  माझा हा निर्णय मला अर्थातच घरच्यांच्या इच्छेविरुध्द घ्यावा लागला.

ह्या काळात मी अपारंपारिक उर्जा स्त्रोतांवरचे नवनवीन उपक्रम राबवले.  शाळेतल्या मुलांसाठी ‘उर्जा वाहिनी’ हा या क्षेत्राबद्दल महत्व सांगणारा उपक्रम बनवला.  अशा अनेक कार्यक्रमांच्या निमित्ताने मी अगदी दिल्ली ते बंगलोर आणि कलकत्ता ते केरळ पर्यंतचा प्रवास केला.  ह्या विषयामधली राष्ट्रीय परिषद आणि विविध कार्यशाळेमध्ये भाग घेतला. त्यामधून ह्या क्षेत्रात काम करणाऱ्या संस्थांची, त्यांच्या कामाची माहिती मला मिळाली.

विज्ञान भारतीच्या ह्या जागरुकतेच्या कामापेक्षा प्रत्यक्ष प्रणाली उभारण्यावर काम करण्याची दिशा नंतर मला खुणावत होती.  त्या दृष्टीने मी संबंधित कंपन्यांच काम जवळून अनुभवलं.  आणि मग स्वतःचं काम सुरु करण्यावर माझा अभ्यास सुरु झाला.  मी आणि माझ्या एका मित्राने मिळून ‘REnerg **REnergize Planet Consultant for Home Lighting System & Solar PV Plant** नावाची अपारंपारिक उर्जा स्त्रोतांच्या क्षेत्रात काम करणारी कंपनी सुरु केली आहे.  ही कंपनी अगदी नुकतीच सुरु केल्याने अजून व्याप छोटाच आहे.

याच अंतर्गत सध्या ‘सर्च’ गडचिरोली, येथे सोलर पॉवर प्लांट सुरु करण्यासाठी माझे प्रयत्न सुरु आहेत. गडचिरोली व आसपासच्या खेड्यांचंउर्जा आधारित सर्वेक्षण करून त्या भागातही अशा प्रकारची कामे करायचा माझा विचार आहे. ‘REnergize Planet’ मार्फत खेड्यात अपारंपारिक उर्जा स्त्रोतांचा प्रचार आणि प्रसाराची कामे करण्याचा माझा मानस आहे. त्यासाठी विविध कंपन्यांचा अभ्यास आणि गरजेनुसार प्रशिक्षण मी घेतो आहे.

सर्च ही संस्था गडचिरोली मधील धानोरा या तालुक्यातील चातगाव शेजारी आहे. या संस्थेच्या परिसराला शोधग्राम असे नाव देण्यात आले आहे. ४० एकरच्या या शोधग्राम मध्ये एक मोठा दवाखाना आणि प्रयोगशाळा आहे. त्याचबरोबर येथे गावात आढळून येणाऱ्या वेगवेगळया समस्यांवर उपाय शोधण्यासाठी आणि त्यावर अभ्यास करण्यासाठी सुसज्ज अशी रिसर्च Lab आहे. वेगवेगळे कृती कार्यक्रम चालवण्यासाठी येथे ऑफिस आहेत. या ठिकाणी जितके लोक काम करतात त्यांच्यासाठी राहण्याची सोय व्हावी म्हणून शोधग्राम मध्ये राहण्यासाठी घरं आणि होस्टेल्स सुद्धा आहेत.

शोधग्राम गावात असल्याने येथे भारनियमनाचे प्रमाण खूप आहे. भारनियमन असतांना डिझेल जानित्रामार्फत (Diesel Generator) उर्जा तयार करून हॉस्पिटलला आणि इतर भागात वीज वापरली जाते. या प्रकाराने उर्जा निर्माण करणे हे फारच खर्चिक काम असते. पण दवाखान्यातली पेशंट्स साठीची तत्काळ गरज लक्षात घेऊन गेली अनेक वर्ष अशा प्रकारे येथे वीज निर्माण केली जाते. अशा प्रकारची उर्जा निर्माण करण्यासाठी खूप मोठ्या प्रमाणात डिझेल लागते आणि शिवाय प्रदूषण सुद्धा होते. शोधग्राम सारख्या भागातले सुंदर वातावरण अशामुळे हळू हळू प्रदुषित होऊ लागते.

शोधग्राम मधली उर्जेची गरज पूर्ण करण्यासाठी आणि डिझेल जानित्रामार्फत निर्माण केलेली उर्जा थांबवण्यासाठी शोधग्राम मध्ये सूर्यापासून मिळणारी उर्जा तयार करणारा सोलर पॉवर प्लांट करण्याचे ठरले आहे. सौरउर्जा हा उर्जेचा अपारंपारिक उर्जास्त्रोत असून तो अमर्यादित आहे. त्याचप्रमाणे अशी उर्जा तयार केल्यामुळे वातावरणात प्रदूषण होत नाही. योग्य अशा Maintenance मुळे खूप सारी उर्जा आपण यातून मिळवू शकतो. अशा प्रकारे उर्जा निर्मिती मुळे शोधग्राम मध्ये भारनियमनाचा प्रश्न उरणार नाही. यामुळे शोधग्राम चे एकूणच Carbon Footprint कमी होण्याचे काम सुद्धा होते.

या प्रकल्पाचे काम सध्या मी पाहतो आहे. त्यासाठी मी संपूर्ण शोधग्राम परिसराचा सर्वे करून सोलर पॉवर प्लांट ची योजना आखली आहे. शोधग्राम ची उर्जेची गरज भागवण्यासाठी ९०KW च्या प्लांटची आवश्यकता आहे. या प्रकल्पामधील सर्वात महत्त्वाचा भाग असतो सोलर. एकदा स्थापित केल्यानंतर हा २५ वर्ष सौरउर्जेची निर्मिती करतो. दिवसा सूर्यप्रकाशापासून उर्जा तयार करून Battery मध्ये साठवली जाते. आणि जशी हवी तशी ती उपयोगात आणली जाते.

सध्या शोधग्राम मध्ये एका वर्षाचा विजेवर आणि डिझेलवर होणारा खर्च ८ लक्ष आहे. दरवर्षी विजेचे आणि डिझेलचे दर वाढत चालल्यामुळे हा खर्च वाढतच जाणार आहे. शोधग्राम मध्ये उभारण्यात येणाऱ्या सौरउर्जेची संपूर्ण प्रणालीचा खर्च जवळपास १.१ कोटी इतका आहे. प्रकल्पाची पहिली पायरी म्हणून आम्ही १५KW Kची प्रणाली उभारण्याचे ठरवले आहे. या पहिल्या पायरीचा खर्च ` १९ लाख इतका आहे. एकदा हा प्रकल्प उभारल्यानंतर दर महिन्याला येणाऱ्या विजेच्या बिलाचा खर्च सहज वाचतो आणि त्या वाचलेल्या पैशातून गावामध्ये खूप सारी विकासाची कामे करता येणे शक्य होते.

हा प्रकल्प पूर्ण करण्यासाठी सध्या आम्ही एकटे पुरेसे नाही. हजार हातांची गरज आहे. या प्रकल्पासंबंधी अधिक माहिती जाणून घेण्यासाठी आणि त्यात आपला वाटा उचलण्यासाठी तुम्ही मला संपर्क करू शकता.

मयुर सरोदे
नाशिक, महाराष्ट्र
मोब. +९१ ८०८७८८५९१८, +९१ ७५८८७३८१३६
मेल: mayursarode17@gmail.com

# हा अंक अपूर्ण आहे

हा अंक कसा वाटला तुम्हाला? आम्हाला तरी हा अंक अपूर्ण वाटतो आहे. यात महाराष्ट्राच्या जिल्ह्याजिल्ह्यातून, तालुक्या तालुक्यातून रहाणाऱ्या , आणि आपल्या मनातले विचार, कथा, स्मृतीबंध, लिहीणाऱ्या हजार हातांची गरज आहे. जागोजाग चालणाऱ्या कार्यांची माहिती असायला हवी. आणि महाराष्ट्रातच नव्हे तर जगातल्या प्रत्येक देशात पसरलेल्या पण मनाने महाराष्ट्राच्या मातीत रमणाऱ्यांचं लिखाण यायला हवंय. हा अंक जसा महाराष्ट्राच्या कोन्याकोपऱ्यात आणि जगाच्या देशोदेशी जातो तसं यातलं लिखाणही यात यायला हवं. बोली भाषांचा सुगंध यायला हवा. तुमचं लिखाण हवं आहे. कृपया आपलं लिखाण etyarth. esahity@gmail. Com वर पाठवा.

याबरोबरच अंकाच्या वाचकांची व्याप्ती वाढायला हवी. तुम्ही आणि तुमच्या सारख्या प्रत्येक वाचकांनी जर आठ मेल आयडी दिल्या तर आपण एक टक्का मराठी माणसांपर्यंत पोहोचू. जास्त दिल्यात तरी हरकत नाही. पण किमान आठ मेल आयडी. आपले मित्र. नातेवाईक. ज्यांना मराठी वाचता येतं अशा फ़क्त आठ लोकांच्या आय डी esahity@gmail.com या आयडी वर पाठवा.

मित्रांनो. आम्ही काही जगावेगळे लोक नाही. तुमच्यातलेच , तुमच्यासारखेच. काही विद्यार्थी, काही नोकरदार, काही व्यावसायिक. आपल्या फ़ावल्या वेळेत हे काम करत असतो. तुम्हाला ही असं काही करावंसं वाटतंय. तर मग या ना. आपण एकत्र काम करूया. तुमच्याकडे काही कल्पना असतील. नव्या. ताज्या. फ़्रेश.. ..

काही जगावेगळं करूया… अपूर्णतेचा अंत करूया !